आरोग्य सेवा संचालनालयांतर्गत कामकाजाबाबत

# महाराष्ट्र शासन
# सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-१३१५/प्र.क्र.५०/सेवा २

गो.ते.रुग्णालय इमारत संकुल १० वा मजला
मंत्रालय,मुंबई ४०० ००१
तारीख: ३ मे,२०१७

**वाचा -**

१) सा.आ.वि. शासन निर्णय क्रमांकः पदस्था-१३१५/प्र.क्र.५०/सेवा २, दिनांक १८.१०.२०१६
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, रा.आ.अ. मुंबई यांचे पत्र क्र. राआसोम/ आआसे / कामकाज / ६३३४३- ३७८ /१६ दिनांक ७ नोव्हेंबर,२०१६

**शासन परिपत्रक -**

दिनांक १८.१०.२०१६ च्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये आरोग्य सेवा संचालनालयाची फेररचना करण्यात आली असून त्यानुसार आरोग्य सेवा संचालनालयाचा विभाग प्रमुख म्हणून संचालक,आरोग्य सेवा यांच्याऐवजी आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांना घोषित केले असून आरोग्य सेवेचे नियंत्रण आयुक्त, कुटुंब कल्याण तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांचेकडे सोपविण्यात आलेले आहे.

२. उपरोक्त संदर्भाधीन दिनांक १८.१०.२०१६ च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, आरोग्य सेवा तसेच आरोग्य सेवेंतर्गत राबविण्यात येत असलेल्या विविध कार्यक्रमांची अंमलबजावणी अधिक प्रभावीपणे होण्याकरिता आयुक्त, आरोग्य सेवा संचालनालय आणि कुटुंब कल्याण कार्यक्रमावर आयुक्त आरोग्य सेवा,मुंबई (आयुक्त कुटुंब तथा संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई ) यांचे नियंत्रण दिनांक १८.१०.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रस्थापित केलेले आहे. त्यानुसार आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांना घोषित केले आहे. तसेच आरोग्य सेवा संचालनालयांतर्गत सर्व प्रकारच्या आरोग्य सेवेशी संबंधीत तांत्रिक विषय संचालक,आरोग्य सेवा यांच्यामार्फत आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडे सादर करणेबाबत व इतर सर्व अतांत्रिक विषय आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांच्याकडे संबंधीत सहसंचालकांनी थेट सादर करण्याबाबत आदेशित केले आहे.

३. संदर्भ क्र.२ येथील दिनांक ७ नोव्हेंबर,२०१६ रोजीच्या परिपत्रकानुसार आयुक्त, आरोग्य सेवा यांनी संदर्भ क्र. १ येथील दिनांक १८ ऑक्टोंबर,२०१६ रोजीच्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार यापुढे सर्व पत्र व्यवहार आयुक्त आरोग्य सेवा यांच्या नावाने करण्यात यावा. तसेच आरोग्य कार्यक्रम आस्थापना विषयक, अर्थ विषयक बाबी, खरेदी इ. सर्व प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा यांच्यामार्फत सादर करावेत असे नमूद केले आहे. तसेच उपसंचालक दर्जाच्या अधिकाऱ्याखालील कर्मचाऱ्यांचे रजा मंजुरीचे अधिकार तसेच दैनदिन प्रशासनिक कामकाज हाताळण्याचे अधिकार संचालक,आरोग्य सेवा यांना दिले आहेत.

४. आयुक्त, आरोग्य सेवा यांनी निर्गमित केलेले दिनांक ७.नोव्हेंबर,२०१६ रोजीचे परिपत्रक हे संदर्भ क्र. १ येथील १८ ऑक्टोंबर,२०१६ रोजीच्या शासन निर्णयाशी सुसंगत नाही. आयुक्तांच्या परिपत्रकातील अनुक्रमांक १ येथील सर्व पत्रव्यवहार आयुक्त, आरोग्य सेवा यांच्या नावाने करण्यात यावा. ही बाब वगळता उर्वरित बाबी मान्य करता येत नाहीत.

५. तरी प्रस्तूत परिपत्रकान्वये पुनश्चः सूचना देण्यात येत आहेत की, दिनांक १८ ऑक्टोंबर,२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे तसेच सदर शासन निर्णयातील नमूद केलेल्या तरतुदींनुसार प्रस्ताव सादर करण्यात यावेत. तसेच आयुक्त, आरोग्य सेवा यांच्या कार्यालयाकडून प्राप्त होणारे प्रस्ताव आयुक्तांच्या वतीने अन्य अधिकाऱ्यांच्या सहीने शासनास सादर केले जातात. त्यामुळे सदर प्रस्तावास आयुक्तांची सहमती घेण्यात आली आहे किंवा कसे याचा बोध होत नाही. तरी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १६ जून,२००५ रोजीच्या शासन परिपत्रकातील तरतुदीनुसार प्रत्येक पत्रावर स्वाक्षरी, खाली अधिकाऱ्यांचे नाव व त्याखाली पदनाम नमुद करण्यात यावे. तसेच पत्रामध्ये आयुक्तांच्या मान्यतेबाबतचा उल्लेख करण्यात यावा. शासन निर्णय दिनांक १८.१०.२०१६ मध्ये नमूद केल्याप्रमाणे अर्थसंकल्प व प्रशासन , प्रशिक्षण व प्रचार, खरेदी आणि एमआयएस या विषयावरील प्रस्ताव संबंधीत सहसंचालक /उपसंचालक/सहायक संचालकांनी संचालकाकडे सादर न करता थेट आयुक्तांकडे सादर करावेत आणि केवळ आयुक्तांच्या मान्यतेने प्रस्ताव शासनाकडे सादर करावेत. सदर परिपत्रक सर्व संबंधीत अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान,मुंबई यांनी आणण्यात यावे व त्यानुसार उचित कार्यवाही करण्याबाबत सूचना देण्यात याव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२०१४०७४९२६१७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2017.05.03 11:17:37 +05'30'

(वि. पुं. घोडके)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, (राष्ट्रीय आरोग्य अभियान) मुंबई

२) आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई
३) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य एडस् नियंत्रण सोसायटी, मुंबई
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना, मुंबई
५) सर्व विभागीय आयुक्त
६) सर्व जिल्हाधिकारी
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
८) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
९) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, (सामाजिक बांधिलकी असलेले कार्यक्रम) पुणे
१०) सर्व सहसंचालक, आरोग्य सेवा
११) सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा
१२) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
१४) सर्व जिल्हा शल्यचिकित्सक,
१५) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी
१६) मा. मंत्री (सा.आ.) / मा.राज्यमंत्री (सा.आ.)यांचे खाजगी सचिव
१७) अपर मुख्य सचिव (सा.आ.) यांचे स्वीय सहायक
१८) संबंधीत अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा,मुंबई )
१९) निवडनस्ती